(३)

महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम १९६६ चे कलम १२७ नुसार आरक्षणाखालील जमीन संपादनासाठी देण्यात आलेल्या खरेदी संदर्भात करावयाची कार्यवाही.

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग
परिपत्रक क्र. पीआरएन ३४९६/१३६/प्र.क्र.५२/९६/नावि -९
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ३१ ऑक्टोबर, १९९७

परिपत्रक

महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम १९६६ चे कलम १२७ अन्वये विकास योजना मंजूर होऊन ती अंमलात आल्यापासून दहा वर्षाच्या कालावधीत, जर नियोजन / समुचित प्राधिकरणाने सार्वजनिक आरक्षणांच्या भूसंपादनाची कार्यवाही केली नाही तर जमीन मालक संबधीत प्राधिकरणावर खरेदी सूचना नोटीस बजावू शकतो. अशी नोटीस बजावल्यानंतर संबंधीत प्राधिकरणामार्फत विहित मुदतीत आवश्यक ती भूसंपादनाची कार्यवाही केली जात नाही. एका प्रकरणात शासनास असेही आढळून आले की, अर्जदाराने कलम १२७ अनुसार नोटीस बजावल्यानंतर संबंधित नगरपालिकेने भूसंपादनासाठीच्या आर्थिक तरतूदी संदर्भात सर्वसाधारण सभेत योग्य असा ठराव न करताच भूसंपादनाचा प्रस्ताव जिल्हाधिकारी यांचेकडे पाठविला व जिल्हाधिकारी यांनी केवळ आर्थिक तरतूदीचे प्रमाणपत्र नसल्याने तो परत पाठविला व आरक्षण रद्द करणेची वेगळी शिफारसही केली. नगरपालिका व जिल्हाधिकारी यांनी ही कार्यवाही सार्वजनिक हित विचारात न घेता केल्याचे दिसते. या प्रकरणी जिल्हाधिकाऱ्यांना नगरपरिषदेच्या जनहिता विरुध्दच्या ठरावाचे पुनर्विलोकन करुन असा ठराव रद्द करणे योग्य ठरले असते. असे संचालक, नगर रचना यांचे मत असून शासनासही ते योग्य वाटते. अशा प्रकारे या प्रकरणी नगरपरिषद व जिल्हाधिकारी यांच्याकडून ज्या प्रकारे कार्यवाही झाली त्यामुळे संबंधित आरक्षण व्यपगत झाले असून अशी प्रकरणे अनेक नगरपालिकांच्या बाबतीत वाढत आहेत असे संचालकांनी कळविले आहे.

वरील परिस्थितीत, महानगरपालिका व नगरपालिका त्याचप्रमाणे जिल्हाधिकारी यांना असे कळविण्यात येते की, ज्या प्रकरणी उक्त अधिनियमाच्या कलम १२७ अन्वये अखरेदी सूचना बजविल्या जातात, अशा प्रकरणी सार्वजनिक हित विचारात घेऊन सार्वजनिक प्रयोजनासाठीच्या आरक्षणांच्या भूसंपादनाची कार्यवाही विहित मुदतीत

करण्याची/सुरु करण्याची दक्षता घेण्यात यावी. ज्या ठिकाणी भूसंपादनासाठी नियोजन प्राधिकरणाशिवाय अन्य प्राधिकरणे समुचित प्राधिकरणे असतात तेथे अशा प्राधिकरणांनाही भूसंपादनाबाबत विहित मुदतीत कार्यवाही करण्याची दक्षता घेणेबाबत नियोजन प्राधिकरणांनी सूचना देणे आवश्यक आहे. संबंधित जिल्हाधिकारी यांनी नगरपालिकांकडून प्राप्त झालेले भूसंपादनाचे प्रस्ताव केवळ तांत्रिक कारणास्तव परत न करता भूसंपादनाकरीता नगरपालिकांना प्रवृत्त करुन जनहिताविरुध्द नगरपालिकेने पारित केलेल्या ठरावाचे गुणवत्तेनुसार पुनर्विलोकन करुन भूसंपादनाची व विकासासाठी नवि.-६ (अ) योजनेअंतर्गत अर्थसहाय्य उपलब्ध होत असल्याने नगरपालिकांनी त्याचा लाभ घेऊन सार्वजनिक प्रयोजनासाठीच्या आरक्षणाची अंमलबजावणी करणे गरजेचे आहे हे याव्दारे स्पष्ट करण्यात येते.

याबाबत संचालक, नगर रचना, उपसंचालक, नगर रचना, सहाय्यक संचालक, नगर रचना, नगर रचनाकार यांनीही संबंधित प्राधिकरणांना वेळोवेळी आवश्यक ते मार्गदर्शन करावे म्हणून आरक्षणांच्या भूसंपादनांच्या कार्यवाहीस चालना मिळेल.

सही/-

( वि. वा. देशपांडे )
महाराष्ट्र शासनाचे उपसचिव